राज्य कामगार विमा योजनेतील विमेदारांना
वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती देण्यासाठी
सुधारित मार्गदर्शक तत्वे.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक : राकायो १०९८/२६७६/प्रक्र २९०/९८/राकावि-२
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ६ मे, २००३.

वाचा:-
१ राज्य कामगार विमा महामंडळ,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.यु-१६ /१२/८०/एमईडी-२(एमआयएससो) दिनांक ७ एप्रिल १९८०
२ शासन निर्णय,नगर विकास व आरोग्य विभाग क्र.इएसआय/ १२८०/२७४२/पीएच-१५ दि.३० मे १९८१
३ शासन निर्णय,सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.एचएफआर/ १०९७/ ३६५३/पीएच-१ दिनांक २ फेब्रुवारी १९८८
४ वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग शासन निर्णय क्रमांक इएसआय ३१८४/५८०/एमईडी-१३ए दिनांक १५ जून १९८८
५ शासन परिपत्रक क्र.वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांक इएसआय/११८८/१३५७/एमईडी-१३ दिनांक ५ जुलै १९८८
६ राज्य कामगार विमा महामंडळ,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.यु-१३/ १२/५/८३(एम) दिनांक २५ जानेवारी १९८९.
७ वित्त विभागाचे पत्र क्र.विसप्र/१०९०/९१/(४१)/विनिमय दि.२६ मार्च १९९१
८ शासन निर्णय,वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्र.इएसआय/११८७/८६४/प्रक्र१३७/एमईडी-३ दि.६ जुलै १९९२
९ आयुक्त कार्यालयाचे पत्र कमांक आयुक्त/राकावियो/वैखप्र/नविन मार्गदर्शक तत्वे/२३९८१/का.क्र.६ दि.२९ मे १९९९ व २० जुलै १९९९
१० शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.एमएजी १०९९/ प्रक्र४०/ आरोग्य-३ दि.२९ जुलै १९९९.
११ शासन निर्णय,सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.इएसआय ३११२/ १८१८/प्रक्र १३३/९२/राकावि-३ दि.२९ ऑक्टोबर १९९९.
१२ शासन निर्णय क्रमांक एमएजी १०९५/सीआर-४५/९५/आरोग्य-३ दिनांक ४ जुलै २०००.
१३ शासन निर्णय,सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.इएसआय १०९८/२६७६/प्रक्र२९०/९८/राकावि-३ दि.३ ऑक्टोबर २०००.
१४ आयुक्त कार्यालयाचे पत्र क्रमांक आयुक्त/राकावियो/वैखप्र/नविन मार्गदर्शक तत्वे/२०६३४/का.क्र.६ दिनांक ६ जुलै २००२.

GR-20030827132256001-1900

प्रस्तावना :-

राज्य कामागर विमा योजनेच्या रुग्णालयामध्ये विमा कामगारांना काही विशिष्ट/अतिविशिष्ट आजारांवरील सेवा उपलब्ध नसल्यामुळे त्यांना व त्यांच्या कुटुंबियांना सरकारी/महानगरपालिका/ रुग्णालयातून त्या उपलब्ध करुन दिल्या जातात. तसेच त्यांना आकस्मिक व निकडीच्या प्रसंगी राकावियो रुग्णालय, सरकारी व महानगरपालिका रुग्णालयात जाणे शक्य होत नाही व खाजगी रुग्णालयात उपचार घ्यावे लागतात. याशिवाय या वैद्यकीय सुविधा राकावियो/सरकारी/महानगरपालिका रुग्णालयातदेखील उपलब्ध होत नाहीत. अशा उच्च प्रतीच्या वैद्यकीय सेवा ज्या खाजगी/धर्मार्थ/विश्वस्त रुग्णालयांमध्ये उपलब्ध होतात त्या रुग्णालयातून उपचार करुन घेतात. अशारितीने विमा कामगारांना राज्य कामगार विमा योजनेतंर्गत राज्य कामगार विमा महामंडळ मेडिकल मॅन्युअल मधील तरतूदीनुसार सामाजिक सुरक्षा योजनेतंर्गत सर्वकष वैद्यकीय सेवा उपलब्ध करुन देणे बंधनकारक असल्याने वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती दिली जाते. कारण विमाधारकांकडून, राकावि महामंडळ त्यांच्या पगाराच्या रु.१.७५% रक्कम व मालकाकडून रु.४.७५% रक्कम मिळून एकूण रु.६.५०% इतकी रक्कम इतर लाभाबरोबर वैद्यकीय हितलाभाकरिता वसूल करते.

अशा प्रकरणी विमाधारकाने स्वत: केलेल्या खर्चाची वैद्यकीय प्रतिपूर्ती देण्यासाठी संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक २१.१०.१९९९ अन्वये प्रभारी वैद्यकीय अधिकारी (विशेषज्ञ केंद्र, सेवा दवाखाने) वैद्यकीय प्रशासन अधिकारी/वैद्यकीय अधिक्षक तसेच आयुक्त,राज्य कामगार विमा योजना यांना प्रतिपूर्तीच्या दाव्यांना मंजूरी देण्याचे वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

वैद्यकीय खर्च प्रतिपूर्तीबाबतची प्रकरणे मंजूर करावयाच्या दृष्टीने, संदर्भांकित शासन निर्णय दि.३.१०.२००० नुसार मार्गदर्शक तत्वे निर्गमित केलेली आहेत. तथापि त्यानुसार वैद्यकीय खर्च प्रतिपूर्तीची प्रकरणे निकाली काढण्याच्या दृष्टीने अडचणी निर्माण होत असल्यामुळे प्रतिपूर्तीची प्रकरणे त्वरेने निकालात काढण्यासाठी सदर मार्गदर्शक तत्वांमध्ये बदल करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :- वर नमूद केलेल्या परिस्थितीत, विमा कामगारांच्या वैद्यकीय खर्चाबाबतची प्रकरणे तपासण्यासाठी यापूर्वीचे मार्गदर्शक तत्वांचे दि.६.७.१९९२ व दि.३.१०.२००० अधिक्रमित करुन खालीलप्रमाणे सुधारित मार्गदर्शक तत्वे या शासन निर्णयाव्दारे निश्चित करण्यात येत आहेत.

## सुधारित मार्गदर्शक तत्वे

राकावि योजनेतंर्गत वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्तीची प्रकरणे खालील सुधारित मार्गदर्शक तत्वांनुसार तपासण्यात यावीत.

१. वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीचा कोणताही प्रस्ताव वरिष्ठ अधिकाऱ्यांना पाठवितांना तो प्रस्ताव पूर्णपणे तपासला आहे, त्याबाबत १००% तपासणी दाखला (प्रमाणपत्र) ज्या अधिकाऱ्याने/कर्मचाऱ्याने तो तपासला असेल त्याने देणे आवश्यक आहे. तसेच रु.२५,०००/- च्या वरील रक्कमेच्या प्रतिपूर्तीचे प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी पाठवितांना असे प्रमाणपत्र आयुक्त,राकावियो च्या स्वाक्षरीने प्रस्तावासोबत पाठविणे आवश्यक आहे.

२ आकस्मिक निकडीच्या प्रसंगी विमाधारक/लाभार्थी यांनी घेतलेल्या वैद्यकीय उपचारांच्या प्रतिपूर्तीकरिता शासन निर्णय,साआवि क्र.एमएजी १०९५/सीआर-४५/९५/आरोग्य-३ दि. ४जुलै २००० सोबतच्या परिशिष्ट एक नुसार २७ गंभीर आजार निश्चित करण्यात आलेले आहेत. त्यामधील अ.क्र.१२ वरील आजार वगळता इतर सर्व आजाराच्या निकडीच्या प्रसंगी नजिकच्या खाजगी रुग्णालयात/शुश्रुषालयात उपचार घेतल्यास खालीलप्रमाणे प्रतिपूर्ती अनुज्ञेय राहील.

(अ)रुग्णालयीन वास्तव्याचा खर्च रु.४०/-प्रतिदिन(राकावि महामंडळाच्या दराप्रमाणे )
(ब)औषधावरील खर्च १००%
(क)इतर उपचार विषयक खर्च ८०%

माात्र,विमाधारकांनी त्यांच्या प्रतिपूर्तीच्या दाव्यासोबत त्यांच्या विभागात घराजवळ सरकारी/महानगरपालिका/राकावियोजना रुग्णालय नसल्यामुळे, जवळच्या खाजगी रुग्णालयात उपचार घेतल्याचे पत्र देणे बंधनकारक आहे. याबाबतची पडताळणी दावा मंजूर करणारे सक्षम अधिकारी यांच्या कार्यालयामार्फत करण्यात यावी.

३ राकावि योजनेमध्ये ज्या ठिकाणी पूर्ण वैद्यकीय सेवा (Full Medical Care) लागू करण्यात आलेली आहे. तथापि, ज्या ठिकाणी रा.का.वि.योजना,रुग्णालय/शासकीय जिल्हा रुग्णालय/महानगरपालिका रुग्णालय उपलब्ध नाही अशा ठिकाणी वर उल्लेख केलेल्या २६ आजारांव्यतिरिक्त इतर आजारांकरिता आंतररुग्ण उपचार खाजगी रुग्णालयात घेतला असल्यास त्याची प्रतिपूर्ती खालीलप्रमाणे करण्यात यावी. हयाबाबतचा निर्णय संबंधित मंजूरी अधिकाऱ्यांच्या स्तरावर घेण्यात यावा.

अ) रुग्णालयीन वास्तव्याचा खर्च रु.४०/-प्रतिदिनी(राकावि महामंडळाच्या दराप्रमाणे)

ब) औषधावरील खर्च - १००%

क) इतर उपचार विषयक खर्च - ८०%

४ विमाधारक/लाभार्थींना राकावियोजनेमार्फत इतर सरकारी/महानगरपालिका रुग्णालयामध्ये पुढील औषधोपचारार्थ पाठविण्यात आले असेल /असतील किंवा आकस्मिक व निकडीच्या प्रसंगी त्यांना उपरोक्त रुग्णालयात उपचार घ्यावे लागले असतील अशा प्रकरणी १००% वैद्यकीय खर्च प्रतिपूर्ती अनुज्ञेय राहील.

५ विशिष्ट परिस्थितीत आकस्मिक निकडीच्या प्रसंगी खाजगी रुग्णालयात उपचार घेतले असल्यास, संबंधीत खाजगी रुग्णालय/शुश्रुषालयाकडून सविस्तर आकस्मिकता प्रमाणपत्र प्रतिपूर्तीच्या दाव्यासोबत सादर करणे जरुरीचे आहे. त्या आधारे राकावि योजना रुग्णालयातील वैद्यकीय अधिक्षक/वैद्यकीय प्रशासन अधिकारी यांनी दावा मंजूर करण्याबाबत निर्णय घ्यावा.

६ हृदयरोगावरील Angio Plasty अथवा Valve Replacement सारखे उपचार खाजगी रुग्णालयामध्ये घेतले असल्यास त्या पृष्ठ्यर्थ दावा निकाली काढताना आवश्यक ते CD\Cassette\films व्दारे तपासणी करुन अशी प्रकरणे निकाली काढण्यात यावीत.

७ कर्करोगावरील बाह्यरुग्ण/आतंररुग्ण म्हणून औषधोपचाराच्या खर्चाची प्रतिपूर्ती -

अ)टाटा रुग्णालय व शासन मान्यताप्राप्त रुग्णालय - १००% (सर्वसाधारण कक्ष)

ब)इतर खाजगी रुग्णालय/शुश्रुषालय येथे उपचार घेतल्यास प्रत्यक्ष खर्च, किंवा टाटा रुग्णालयाचे दर अथवा जवळपासच्या शासनमान्य रुग्णालयाचे दर यातील कमी असलेली रक्कम अनुज्ञेय राहील.

क)औषधांवरील खर्च १००% अनुज्ञेय राहील.

८ ज्यावेळी राकावि योजना रुग्णालयात रुग्णवाहिकेची किंवा इतर वाहनांची सोय उपलब्ध नसेल त्यावेळी विमेदाराला स्वतः वा रुग्णांसाठी वाहनाकरिता कराव्या लागलेल्या खर्चाची विहित दरानुसार प्रतिपूर्ती अनुज्ञेय राहील. मात्र,संबंधित वैद्यकीय अधिकाऱ्यांनी वाहनसेवा उपलब्ध नसल्याचे प्रमाणपत्र देणे आवश्यक राहील.

९ प्रभारी,वैद्यकीय अधिकारी (विशेषज्ञ केंद्र/सेवा दवाखाने) यांचे अधिकारातील वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्ती प्रकरणांचे लेखा परिक्षण, वैद्यकीय प्रशासन अधिकारी यांचे कार्यालयातील अंतर्गत लेखा परिक्षण विभागाकडून करण्यात यावे.

१० वैद्यकीय प्रशासन अधिकारी,वैद्यकीय अधिक्षक,आयुक्त,राकावि योजना, यांचे अधिकारातील प्रकरणांचे लेखा परिक्षण आयुक्तालयांतील अंतर्गत लेखा परिक्षण विभागाकडून करण्यात यावी.

११ आयुक्त,राकावि योजना,मुंबई व राकावि योजनेतील सर्व संबंधित वैद्यकीय अधिक्षक, वैद्यकीय प्रशासन अधिकारी व सेवा दवाखान्यातील प्रभारी वैद्यकीय अधिकारी (विशेषज्ञ केंद्र/सेवा दवाखाने) यांनी, वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीस मंजूरी देतानां शासन निर्णय,साआवि क.इएसआय ३९९२/१८९८/प्रक १३३/९२/राकावि-३ दि. २९ ऑक्टोंबर १९९९ अन्वये त्यांना प्रदान केलेल्या वित्तिय अधिकाराच्या अधिन राहून मंजूरी द्यावी आणि या संदर्भात उपरोक्त मार्गदर्शक तत्वांचे काटेकोरपणे पालन होईल अशी दक्षता घ्यावी.

१२ वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीचे प्रत्येक प्रकरण राकावि महामंडळ मेडिकल मॅन्युअलमध्ये दिलेल्या मार्गदर्शक तत्वाच्या अधिन राहून स्विकृत करावे.

१३ आखून दिलेली किंवा शासनाने सूचित केलेले कार्यपध्दती व सर्वसाधारण आदेशांचे संबंधितांकडून अनुपालन करण्यात यावे.

१४ वैद्यकीय खर्च प्रतिपूर्ती/तपासणी किंवा चाचण्या बद्दलचे देय रक्कमेच्या रु.१००००/- ते रु.२५,०००/- च्या मंजूरी आदेशाची प्रत लेखा परिक्षा अधिकारी/ वित्त विभाग(विनियम कार्यासन व संबंधित व्यय कार्यासनास) पाठवावी.

१५ वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी होणारा खर्च राज्य शासन व राज्य कामगार विमा महामंडळ यांच्यात १:७ या प्रमाणात विभागण्यात यावा आणि तो वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

१६ हे आदेश सदर शासन निर्णय निर्गमित झालेल्या दिनांकापासून अंमलात येतील, तसेच अनिर्णीत (प्रलंबित) प्रकरणांना ही सदर आदेश लागू राहतील. मात्र, यापूर्वी निर्णय झालेलो प्रकरणे पुन्हा उघडून त्यावर या शासन निर्णयानुसार कार्यवाही करता येणार नाही.

१७ हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५८४/०२/व्यय १३ दिनांक ७.९.२००२ व क्र.४९६/विनियम दि.१८.११.२००२ अन्वये दिलेल्या त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

(भि.रा.उके)
महाराष्ट्र शासनाचे उप सचिव.

प्रति

आयुक्त,राज्य कामगार विमा योजना,मुंबई.
संचालक,(वैद्यकीय/प्रशासन),राज्य कामगार विमा योजना,मुंबई.
वैद्यकीय प्रशासन अधिकारी,राकावि योजना,मुंबई/पुणे/नागपूर
सर्व वैद्यकीय अधिक्षक, रा.का.वि.योजना रुग्णालये.
वैद्यकीय अधिक्षक,महात्मा गांधी स्मारक रुग्णालय,परेल,मुंबई.
वैद्यकीय आयुक्त,राकावि महामंडळ,पंचदिप भवन,कोटला रोड,नवी दिल्ली.
प्रादेशिक संचालक,राकावि महामंडळ,पंचदीप भवन,ना.म.जोशी मार्ग,मुंबई.
महालेखापाल(लेखा परिक्षा),१/२,महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
निवासी लेखा अधिकारी,मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
वित्त विभाग कार्यासन व्यय-१३/विनियम
निवड नस्ती(राकावि-२)सार्वजनिक आरोग्य विभाग,मुंबई
निवड नस्ती(राकावि-३),सार्वजनिक आरोग्य विभाग,मुंबई.